# कालकी अवतार केव्हा अवतरेल?

### कलकी अवताराबद्दलची आकडेवारी आणि वस्तुस्थिती

- पवित्र पुराण असे सांगते की, एकंदर २४ अवतार असुन गौतमबुध्द हा २३वा अवतार होते.

भागवत पुराण असे कथन करते की, २४व्या अवताराचे नाव हे कलकी अवतार असे असेल.

गौतमबुध्दानी त्याच्या अनुयायी नंदा ह्याला असे सांगितले "हे नंदा मी हा पहिला बुध्द नाही किंवा शेवटचा बुध्द पण नाही. माझ्यानंतर आणखी एक बुध्द येईल. त्याचे नाव मैत्रेय असेल."

(गॉसपेल ऑफ बुध्द, लेखक करूस पान नं २१७)

- स्वामी विवेकानंद, गुरूनानकजी आणि हिंदु धर्माचे अन्य बुध्दिमान उदा. पंडित सुंदरलाल, श्री. बलरामसिंग परिहर, डॉ. वेदप्रकाश उपाध्याय, डॉ. पी.एच. चौबे, डॉ. रमेश प्रसाद गर्ग, पंडीत दुर्गाशंकर सत्यर्थी, श्री. केशरीलाल भगत हे सर्व असे मान्य करतात की, अवतार म्हणजे ईश्वर पृथ्वीवर परत जन्म घेतो असे नाही तर अवतार म्हणजे जो ईश्वराचा प्रतिनिधी (प्रेषित) असून त्याचा संदेश सर्वत्र पसरवित असतो किंवा अवतार म्हणजे संदेशवाहक होय.

(हज़रत मुहम्मद आणि भारतीय धर्मग्रंथ, लेखकः डॉ. एम. ए. श्रीवास्तव)

- अवतार का आगमन करतो?

*"यदा यदा ही धर्मस्य ग्लानिर्भवति भारत।*
*अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मान सृजाम्यहम।।*

(भगवद्‌गीता)

म्हणजे जेव्हा वाईट प्रवृत्तीचे लोक हे समाजावर अधिसत्ता गाजवितात व त्यामुळे जगात अमानुषतेचा प्रसार होतो. अवतार हा ती दुष्ट वृत्ति नष्ट करण्यासाठी येईल व जगात शांति आणि मानवता पूर्ववत आणून ठेवील. तसेच साधुवृत्तीच्या लोकांची प्रतिष्ठा पुन्हा पुर्वीप्रमाणेच परत राखील.

### शेवटचा अवतार कोणत्या युगांत अवतरेल?

- उसबॉन ह्यांनी लिहिलेल्या जागतिक इतिहासाच्या ज्ञानकोशानुसार आपल्या पृथ्वी ग्रहाचे वय हे ४५५० करोड वर्षे आहे.
- हिंदुच्या धार्मिक पुस्तकानुसार युगाचा काळ हा चार समुहात विभागला गेला आहे.
- प्रथम भाग म्हणजे सत्य युग तो कृत युग म्हणून पण प्रसिद्ध आहे. ह्या युगाचा कालावधि हा १७ लाख २८ हजार वर्षे इतका आहे.
- दुसरे युग म्हणजे त्रेता युग. ह्याचा काळ हा १२ लाख ९६ हजार वर्षे इतका आहे.
- तिसरे युग म्हणजे द्वापार युग होय. हा ८ लाख ६४ हजार इतक्या वर्षे कालावधीचा आहे.
- शेवटचे युग म्हणजे कलियुग म्हणून ओळखले जाते. त्याची काळमर्यादा ही ४ लाख ३६ हजार वर्षे इतकी आहे.
- सध्याचे चालू युग हे कलियुग आहे आणि सध्या ह्या युगातील अंदाजे ५१०० वर्षे ही संपलेली आहेत.
- अखेरचा अवतार जो कलकी अवतार म्हणुन ओळखला जातो. ह्यांचे आगमन कलियुगांत होईल. (कलियुगात जन्म होईल)

(भागवतपुराण १२:२:२७)

*इत्थ कलौ गतप्राये जनेषु खर धर्मणि-१*
*धर्म त्राणाय सत्वेन भगवानवतरिष्यति-२*

### कलकी अवतार कोणत्या वर्षी जन्माला येईल?

नमीचंद्र ह्याने संकलन केलेला जैन धर्माच्या त्रिलोकसागर नावाचा ग्रंथ असे सूचित करतो की, महावीर स्वामीच्या मृत्युनंतर ६०५ वर्षे व ७ महिन्यांनी शाकराज जन्माला आला आणि शाकराजच्या मृत्युनंतर ३९४ वर्षे ७ महिन्यांनी कलकी अवताराचा जन्म झाला.

*पणछस्सयं वस्संपण मासजंद गमिय वीर णिवुइ दो।*
*सगराजो सो कतिक चतुणवतिद महिप सगमासं।।*

(त्रिलोकसागर प.३२)

- उत्तर-पुराणानुसार महावीर स्वामीच्या निर्वाणानंतर (मृत्युनंतर) १००० वर्षांनी कलकी अवताराचा जन्म झाला.

(गुणभद्र इंडियन ॲंटीक्वेरी, भाग UP.१४३)

- महावीर स्वामीच्या मृत्यूचे वर्षे अंदाजानुसार ५०० बी.सी. आहे. म्हणुन कलकी अवताराची जन्म तारीख ही अंदाजे ५०० ए.डी वर्षे ही आहे.

### कुठल्या दिवशी कलकी अवतार जन्म घेईल?

- कलकी अवतार हा माघ महिन्यांतील शुक्लपक्षाच्या (चांद्रमास) १२व्या शुभदिवशी जन्माला येईल. (कलकी पुराण-२:१५)

*द्वादश्यां शुक्ल पक्षरस्य माधवे माधवम-१*
*जातो दद्रूशुत पुत्रं पित्रौदृष्टमानसौ-२*

(कलकी पुराण-२:१५)

### अवतार हा कोणत्या ठिकाणी जन्माला येईल?

*कलकी अवतार हा संभल गावात जन्माला येईल*
*शम्भले विष्णुयशसो गृहे प्रादुर्भाविष्याम्यहम्।*

(कलकी पुराण-२:४)

### या कलकी अवताराची कौटुंबिक पार्श्वभुमि कशी असेल?

- कलकी अवताराचा जन्म हा मुख्य धर्मोपदेशकाच्या घरांत होईल. त्याच्या वडिलांचे नाव हे विष्णुयश असेल. (भागवत पुराण १२:२:१८)

*शम्भल ग्राम मुख्यस्य ब्राम्हमणस्य महात्मनः-१*
*भवने विष्णुयशसो गृहे प्रादुर्भाविष्यति-२*
*शम्भले विष्णुयशसो गृहे प्रादुर्भाविष्याम्यहम-*
(कलकी पुराण-२:४ आणि २:११)

- कलकी अवताराच्या मातेचे नाव सुमती असेल.

*सुमत्या विष्णुयशसो गर्भधत्त वैष्णवम्* (कलकी पुराण-२:४)

## कलकी अवताराची वैशिष्टये काय असतील?

- भागवत पुराण १२:२:१६ असे सांगते की, देवदुतांनी दिलेल्या चपळ घोड्यावर स्वार झालेला व आठ गुणविशेषांनी झळकणारा व हातात तलवार असलेला असा हा विश्वाचा तारणहार असेल आणि तो सर्व दुष्टांचा नाश करील.

*अश्वमाशुगमारूमहय देव दत्तं जगृत्पतिः*
*असिनासाधु दमनमष्टैश्वर्य गुणान्वितः*
(भागवत पुराण १२ स्कंध २:१६)

- भागवत पुराण असे सूचित करते की, कलकी अवतार हा शेवटचा किंवा अंतिम अवतार असेल. (भागवत पुराण १:३:२४)

- कलकी पुराण असे सांगते की, परशुराम हा पर्वतावरील एका गुहेमध्ये कलकी अवताराला ज्ञान देईल.

- कलकी पुराण असेही सांगते की, कलकी अवतार हा प्रथम उत्तर दिशेला जाईल व त्यानंतर परत येईल.

- कलकी पुराण (२:५) असेही सांगते की, कलकी अवताराला चार साथीदार असतील व ते सैतानी वृत्तीच्या लोकांवर मात करण्यासाठी कलकी अवताराला साहाय्य करतील.

*चतुर्भिभ्रामृभिदेव करिष्यामी कलिक्षयम* (कलकी पुराण १:३:२४)

- कलकी पुराण (२:७) असे सांगते, देवदुत हे कलकी अवताराला मदत करतील.

- भागवत पुराण (१२:२:२०) सांगते की, कलकी अवताराला अत्यंत आकर्षक व लोभस व्यक्तिमत्व असेल.

*विचरन्नाशुना क्षोण्यां हयेनाप्रतिमद्युतिः-१*
*नृपलिंगप्तेछदो दस्युन कोटिशोनिहनिष्यतिः-२*
(भागवत पुराण १२, स्कंध २, १:२०)

- भागवत पुराण (१२:२:२१) असे सांगते, कलकी अवताराच्या शरीराला मनमोहक सुगंध असेल व त्याच्या सभोवतालची हवा (वातावरण) हे सुगंधित होईल.

*अथतेषां भविष्यान्ति मनांसि विशदानितै।*
*वसेदेवांगसगाति पुष्पगंधा निलस्पृशाम।*
(भागवत पुराण १२, स्कंध २१)

- भागवत पुराणांतील भाग १२, प्रकरण २ मध्ये असा उल्लेख केलेला आहे की, कलकी अवताराला पुढील आठ गुणवैशिष्टये असतील.

शहाणपण, सन्माननीय वंशावळ (माननीय कौटुंबिक पार्श्वभुमी) स्वतःवर नियंत्रण, सखोल ज्ञान, शौर्य (शुरपणा), मोजके बोलणे (मितभाषी), अत्यंत उदार आणि अतिशय कृतज्ञ.

*अष्टा गुणाः पुरूषं दीप्यन्ति।*
*प्रज्ञा च कौल्यं दमः श्रुत च।*
*पराक्रमश्च बहुभाषिला च।*
*दानं गथा शक्ति कृतज्ञता च।* (महाभारत)

कलकी अवतार हा वैदिक धर्माची स्थापना करील. आपण कलकी अवताराबद्दल जास्तीत जास्त तपशील माहिती करून घेतली. हा अवतार अजुन येणार आहे किंवा आधीच येऊन गेला. ह्याचा शोध घेण्याचा प्रयत्न करूया.

## पृथक्करण (सूक्ष्म अभ्यास)

आपण सध्या प्रगतीशील जगात जगत आहोत. याचे एक उत्तम उदा. म्हणजे ७ ऑक्टोबर २००१ साली अमेरिकेने अफगाणिस्थानवर हल्ला केला, तेव्हा बी-५२ बॉबर्स (Bomber) विमानांनी अमेरिकेहून उड्डान केले, त्यांनी अफगाणिस्थानवर बॉम्बसचा मारा केला व जमिनीला स्पर्शही न करता ती विमाने अमेरिकेला परत आली. अमेरिकेने उपग्रह-मार्गदर्शन केलेल्या क्षेपणास्त्रांच्या (Missile) साहाय्याने तालिबान अतिरेक्यांच्या पाकिस्तांनातील लपण्याच्या जागांवर यशस्वीरीत्या हल्ले चढवले आहेत.

आपण अशा युगांत प्रवास करीत आहोत जिथे पृथ्वीच्या दुसऱ्या बाजुला हल्ला करून परत येऊ शकतो आणि (Unmanned satellite guided missile) ह्यांच्या साहाय्याने आपण ३००० कि.मी.पर्यंत अचुक हल्ला करून क्षत्रुचा नाश करू शकतो.

संशोधनकार्य व विकास हा इतक्या वेगाने होतो आहे कि, अल्पकाळात लोक आकाशात उपग्रहामध्ये ठेवलेल्या लेसरगननी युद्ध करू शकतील. तरीसुद्धा अजूनही आपण ह्या विश्वाचा रक्षणकर्ता "अखेरचा अवतार" हा जन्म घेईल आणि क्षत्रुंशी घोड्यावर बसुन व हातात तलवार घेऊन युद्ध करेल अशी अपेक्षा का करतो?

अशी गोष्ट घडुन येण्यासाठी ही संपुर्ण मानवजात तिच्या वैज्ञानिक विकासासकट पूर्णपणे नष्ट झाली पाहिजे. व त्यानंतर जे जिवंत राहतील त्यांनी जीवन पुन्हा सुरू करून व शुन्यापासून पुन्हा नवीन विकास ह्यांचा नव्याने आरंभ करावा लागेल. नंतर बाकी लोकांमध्ये एखादा सैतानी वृत्तिचा मनुष्य असेल, तर त्याचा घोड्यावर बसून आणि हातात तलवार घेऊन शेवट करता येईल. पण जर अशी गोष्ट घडुन यावयाची असेल तर ह्या विश्वाच्या संपुर्ण विनाशानंतर ह्या जगाच्या रक्षणकर्त्याच्या आगमनाचा उपयोग काय? म्हणुन आपण जर अशा तऱ्हेने विचार केला तर तो चुकीचा ठरू शकतो.

११०० ए.डी. पासून अरब हे सोडा व कोळशाची पावडर ह्यांचे मिश्रण वापरून स्फोटकांचा वापर करीत आहेत.(स्फोटक निर्माण झाल्याने तलवारीचे महत्व कमी झाले) म्हणुनच कलकी अवताराचे युग हे ११०० ए. डी. च्या पूर्वीचे असले पाहिजे.

- उत्तर पुराण आणि त्रिलोक सागर ह्यांच्यानुसार महावीर स्वामींच्या मृत्युच्या १००० वर्षानंतर कलकी अवताराचा जन्म झाला असेल. म्हणजेच अंदाजे ५०० ए.डी. वर्षी. आता भारतामध्ये ५०० ए.डी. ह्या काळात कोणी धार्मिक व्यक्तिने जन्म घेतला का ह्याचा अभ्यास करू या.

• २४ वा अवतार ही काही अनोळखी व्यक्ति असू शकत नाही. ती प्रसिद्धच असली पाहिजे, कारण यापुर्वीचे अवतार उदा. गौतमबुद्ध, श्रीकृष्ण, श्रीरामचंद्र हे अत्यंत सुप्रसिद्ध आहेत व ते प्रत्येक व्यक्तिला माहीत आहेत. परंतु दुदैवाने भारतात ५०० ए.डी.च्या सुमारास जन्म घेतलेला व ज्याचा अवतार म्हणुन विचार केला जाईल अशी कोणतीही व्यक्ति सापडत नाही.

• म्हणून भारताच्या बाहेर आपण त्याचा शोध घेऊ या. अखेरच्या १५०० वर्षातील अत्यंत प्रभावशाली अशा व्यक्तिंच्या इतिहासाचा आपण अभ्यास करू या. जर आपण श्री. डब्लू एच.हार्ट ह्याने लिहिलेल्या इतिहासांतील अत्यंत प्रभावशाली अशा १०० व्यक्ति (The most 100 influential person in history) ह्या पुस्तकाचा संदर्भ घेतला तर त्या पुस्तकांत प्रथम स्थानावर हजरत मुहम्मद (स.) ह्यांचे नाव प्रथम दिसते व त्यांचा जन्म हा ५७१ ए.डी. मध्ये झाला. आणि अन्य कोणतीही व्यक्ति त्यांच्यासारखी किर्ती असलेली अशी ५०० ए.डी. वर्षाच्या आसपास जन्माला आलेली नव्हती.

• कलकी अवताराचा जन्म व मुहम्मद साहेब (स.) ह्यांचा जन्म हा समान आहे ही एक योगायोगाची गोष्ट असू शकते. म्हणुन मुहम्मद साहेब (पीबुह) ह्यांच्यासंबधीचा तपशील व भविष्यवाणी ह्यांची तुलना कलकी अवताराशी करूया.

१) जन्मतारीख
२) जन्मस्थान
३) कौटुंबिक पार्श्वभुमि
४) वडिलांचे नाव
५) आईचे नाव
६) त्यांचा गुरू किंवा ज्ञानाचा स्त्रोत
७) त्यांची जबाबदारी
८) त्यांचे साथीदार
९) त्यांचे मूलभूत व्यक्तिमत्व
१०) अखेरचा अवतार
११) अन्य संबंधित भाकिते

## 1) जन्मतारीख :-

कलकी पुराणानुसार (२:२५) कलकी अवताराचा जन्म हा माघ महिन्यांतील पौर्णिमच्या १२व्या दिवशी होईल. मुहम्मद साहेब (स) ह्यांचा जन्म पण पौर्णिमच्या १२व्या दिवशी रबिउल अवल ह्या महिण्यांत झाला. तोही माघ महिन्याच्याच समान आहे.

## 2) जन्मस्थान :-

भारतात सांभल नावाचे ठिकाणच अस्तित्वांत नाही. दोन ठिकाणांची नावे सारखी आहेत उदा. संभालपूर (Sambalpur) आणि संभारलेक (Sambar Lake) पण अशी श्रेष्ठ व्यक्ति ह्या ठिकाणी जन्माला आली ह्याबद्दल तिथे कोणालाही काहीच माहिती नाही.

डॉ. वेदप्रकाश उपाध्याय (प्रयाग विश्वविद्यालयाचे संस्कृतचे विद्वान) असे सांगतात, वैदिक संस्कृतीनुसार साम म्हणजे शांती. सांभल म्हणजे जेथे एखाद्यास शांतता मिळते अशी जागा.

मुहम्मद साहेब (स.) ह्यांचा जन्म मक्का येथे झाला. ह्या शहराला बलादिल-अमिन ह्या नावाने ओळखले जाते.(कुराण ९५:३) अरबीमध्ये बलद म्हणजे शहर व अमिन म्हणजे शांति. म्हणजेच ज्या ठिकाणी मानवाला शांति मिळते असे शहर.

## 3) कौटुंबिक पार्श्वभुमि :-

भागवत पुराणानुसार कलकी अवताराचा जन्म हा प्रमुख धर्मोपदेशकाच्या घरी होईल. हजरत अब्दुल मुत्तालिब जे मुहम्मद साहेब (स.) ह्यांचे आजोबा होते. हे मुख्य धर्मोपदेशक व काबाह (मक्का) ह्यांचे विश्वस्त होते.

## 4) आई-वडीलांची नावे :-

• कलकी अवताराच्या वडीलांचे नाव विष्णुयश असेल म्हणजेच विष्णुची पुजा करणारा किंवा ईश्वराचा पुजारी. मुहम्मद साहेब(स.) ह्यांच्या वडीलांचे नाव अब्दुल्लाह होते. म्हणजे ईश्वराचा आज्ञाधारक.

• कलकी पुराणानुसार कलकी अवताराच्या आईचे नाव सुमति हे असेल ह्याचा अर्थ प्रेमळ व विचारी. मुहम्मद साहेब(स.) ह्यांच्या आईचे नाव अमिना होते. अमिना ह्याचा अर्थ शांत, प्रेमळ, विचारी असा होतो. मुहम्मद साहेब(स.) हे त्याच्या जन्मस्थान मक्का शहरापासुन उत्तर दिशेकडे असलेल्या मदिना या शहराकडे स्थलांतर करून गेले. त्यांच्या स्थलांतराच्या ८ वर्षांनंतर त्यांनी मक्का शहर पुन्हा जिंकले. म्हणजेच ते त्यांच्या जन्मभुमिच्या शहरी परत आले.

• कलकी पुराण असे सांगते की, कलकी अवतार हा पर्वतावर जाईल जेथे त्यांना परशुरामकडुन ज्ञान प्राप्त होईल.

• मुहम्मद साहेब(स.) हा पण पर्वतावरील एका गुहेत जिला गारे हिरा असे म्हणत, ह्या ठिकाणी शांति व सखोल विचार करण्यासाठी जात होते. हे एक ऐतिहासिक सत्य आहे. ह्या गुहेमध्ये वयाच्या चाळिसव्या वर्षी त्यांना मुख्य देवदूत जीब्राईल ह्यांच्याकडून ज्ञानप्राप्ति झाली.

• भागवत पुराण (१२:२:६) सांगते की, कलकी अवतार हा जगाचा तारणहार व रक्षणकर्ता होईल.

पवित्र कुराणात ईश्वर असे सांगतो,

*“आम्ही मुहम्मद साहेब(स.) ह्यांना 'रहमातुल्लिल आलमिन' म्हणुन पाठविले आहे.”* (पवित्र कुराण २१:१०७)

रहमत म्हणजे कृपाप्रसाद. आलमिन म्हणजे विश्व. म्हणजेच माणवजातीच्या कल्याणासाठी ईश्वराचा कृपाप्रसाद. म्हणजे पृथ्वीवरील शांततापूर्ण जीवनासाठी जग हे मुहम्मद साहेब (स.) ह्यांच्याकडून मार्गदर्शन घेईल. तसेच हमखास मुक्ति, पापविमोचन आणि शाश्वत यश ह्यासाठीही मार्गदर्शन घेईल.

• कलकी पुराण (२:५) सांगते की, सैतानाचा पराभव करण्यासाठी कलकी अवताराला त्यांचे चार अनुयायी मदत करतील. (कली म्हणजे पापी)

Encyclopedia of world history by W.L. Langer ह्यांचे पान नं १८४ असे सांगते की, मुहम्मद साहेब (स.) ह्यांच्यानंतर त्याचे चार अनुयायी म्हणजे अबू बकर(रजी.अ.), उमर(रजी.अ.), उस्मान(रजी.अ.) व अली(रजी.अ.) ह्यांनी इस्लाम धर्माच्या संदेशाचा प्रसार केला. तसेच एका ईश्वराचे तत्व आणि जुन्या अमानवी परंपराचा त्याग ह्यांचादेखील त्यांनी प्रचार केला.

• कलकी पुराण (२:७) सांगते, कलकी अवताराला युद्धभुमीवर देवदूताची मदत मिळेल.

मुहम्मद साहेब(स.) व त्यांचे साथीदार हे बदरच्या लढाईत फक्त ३१३ एवढेच होते व त्यांच्या क्षत्रुंकडे १००० सैनिक होते. खंदकाच्या लढाईत मुस्लिमांची संख्या सुमारे ३००० तर त्यांच्या शत्रुपक्षाकडे सुमारे १५००० सैनिक होते. ह्या दोन युद्धामध्ये व पुष्कळ वेळा त्यांनतरही पण मुहम्मद साहेब (स.) ह्यांना शत्रुंवर विजय मिळवण्यासाठी देवदूतांचे साहाय्य लाभले होते. पवित्र कुराण हे त्याला प्रकरण (३:१२३:१२५) (८:६) (२३:६) ह्यामध्ये पुष्टी देते.

• भागवत पुराण (१२:२:२१) असे सांगते की, कलकी अवताराच्या शरीराचा सुगंध हा मनमोहक असेल. त्यामुळे त्याच्या भोवतालचे वातावरण हे सुगंधी बनेल.

हादिसचे पुस्तक असे सांगते की, एकदा मुहम्मद साहेब(स.) हे झोपले होते, तेव्हा उम्मी सलमाने त्याचा घाम गोळा केला. जेव्हा ते जागे झाले त्यावेळी त्यांनी विचारले "माझ्या घामाचे तू काय करशील? तेव्हा ती म्हणाली "आम्ही त्याचा सुगंध(अत्तर) म्हणुन वापर करू."

जो मुहम्मद साहेब (स.) ह्यांच्याशी हात मिळवेल त्याचे हात हे संबध दिवसभर सुगंधित राहतील. (शमाईल तिरमिधि,पान क्र.२०८)

मुहम्मद साहेब(स.) ह्यांचा नोकर अनस असे म्हणाला,"जेव्हा मुहम्मद साहेब(स.) हे त्यांच्या खोलीतून बाहेर येत असतात, तेव्हा त्याच्या आगमनाची वार्ता आम्हाला त्यांच्या भोवतालच्या मनमोहक सुगंधित वातावरणामुळे कळुन येत होती. (Life of Mohammad by sir William Muir, पान क्र.३४२)

• भागवत पुराण (विभाग क्र.२, प्रकरण २) असे सांगते की, कलकी अवतार आठ खास वैष्टिये धारण केलेला असेल. उदा. शहानपणा, सन्माननीय घराणे (वंशावळ) स्वनियंत्रण, ईश्वरी ज्ञान, बहादुरी, मोजके भाषण (मितभाषी), जास्तीत जास्त उदारपणा आणि उपकार करणारा.

पुढील मुसलमान नसलेल्या लेखकांची पुस्तके ही मुहम्मद साहेब(स.) ह्यांच्यामध्ये वरील सर्व गुणविशेष असल्याची बळकटी देतात.

1) Life of Mohammad- by sir Vilieum muir.
   Publisher- Smith alder & company(London)
2) Introduction to the speeches of Mohammed
   Author:- Lane pool,
   Publisher- Macmillion & company London)
3) Mohammed & Mohammed
   Author- R. Bos Worth Smith

• भागवत पुराण(१२:२:१६) असे सांगते आठ वैशिष्ट्यांनी भुषवलेला देवदूतांनी दिलेल्या चपळ घोड्यावर बसुन स्वार झालेला व हातात तलवार असणारा हा विश्वाचा रक्षणकर्ता सर्व दुष्ट माणसांवर विजय मिळवेल.

मुहम्मद साहेब(स.) ह्यांनापण देवदुतांकडुन बुराक नावाचा चपळ घोडा मिळाला होता.

मुहम्मद साहेब(स.) ह्यांच्याकडे स्वतःचे सात घोडे आणि नऊ तलवारी होत्या व त्याचा वापर ते ईश्वराचा संदेश पसरविण्यासाठी शांति किंवा युद्ध या मार्गाने करीत होते.

• भागवत पुराण(१:३:२४) असे सांगते, कलकी अवतार हा अंतिम वा शेवटचा अवतार असेल. पवित्र कुराणाने पण मुहम्मद साहेब(स.) ह्यांचे शेवटचा प्रेषित असे वर्णन केले आहे.(पवित्र कुराण ३३:४०)

• पवित्र पुराण सांगते, कलकी अवतार हा वैदिक धर्माची स्थापना करील. मुहम्मद साहेब(स.) ह्यांनी कुराणाप्रमाणे धर्माचे शिक्षण दिले. तसेच एकंदरीत पवित्र वेद आणि कुराण ह्यांची शिकवण ही सारखीच आहे. म्हणजेच एकाच ईश्वराची प्रार्थना आणि मानवतेचे पालन करणे. म्हणुन इस्लाम हा पण वैदिक धर्मच आहे. "Teaching of vedas & Kuran" हे शीर्षक असलेल्या पुस्तकामध्ये आपण दोन्ही पवित्र पुस्तकामध्ये समान असणाऱ्या श्लोकांचा अभ्यास करणार आहोत. (सदर पुस्तक तुम्हाला www.Scribd.com या वेबसाइटवर आपण मोफत पाहु शकतो)

• कलकी अवतारासाठी केलेली भविष्यवाणीची वैशिष्ट्ये ही मुहम्मद साहेब(स.) ह्यांच्याशी तंतोतंत जुळतात. म्हणुन बहुतेक सर्व संस्कृत विद्वान उदा. डॉ. वेदप्रकाश उपाध्याय, असे सांगतात की, मुहम्मद साहेब(स.) हाच कलकी अवतार आहे ज्याची प्रत्येकजण वाट पाहात आहे.

नराशंस, कलकी अवतार आणि मुहम्मद(स.) ह्यांची तपशीलवार आणि सखोल ज्ञान मिळवण्यासाठी कृपया खालील पुस्तकांचा संदर्भासाठी वापर करा.

1) Kalki avtar & hjrat Mohammed
   Author- Dr. Vedprakash Upadhay
   Publisher:- Jamhoor Book Depot, DEOBAND, (U.P) Pin:- 247554
2) Narashansa over antim rushi.
   Author- Dr. Vedprakash Upadhay
   Publisher:-Jamhoor Book Depot, DEOBAND, (U.P) Pin:- 247554
3) Mohammed over Bhartiya Dharm granth
   Author- Dr. M.A. Srivastav
   Publisher:-Msdhur Sandesh Sangam, E-20, Abdul Fazl Enclave, Jamia Nagar, New Delhi-110025.
   E-mail : madhursandeshsandeshsangam@yahoo.com
4) Mohammed in the world Scriptures
   Author- A.H. Vidyarthi
   Publisher: Adam Publishers & Distributors, 1542, Pataudi House, Darya Ganj, New Delhi-110002.
   www.adambooks.com

5) Muhammad in the Hindu Scriptures
Author- Dr. Ved Prakash Upaddhay
Publisher: A.S. Noordeen, P.O. Box 10066
50704 Kuala Lumpur. Tel:- 03-40236003
Fax :- 03-40213675.
E-mail- asnoordeen@yahoo.com,
holybook@tm.net.my

- बोद्ध धर्मिय लोक हे आपल्या वैदिक धर्माच्या २३व्या अवताराचे अनुयायी आहेत. कारण गौतमबुद्ध हा २३ वा अवतार होते.

मुस्लिम हे वैदिक धर्माच्या २४व्या अवताराचे अनुयायी आहेत. कारण कलकी अवतार हा २४वा अवतार होते व मुहम्मद(स) हे कलकी अवतार आहेत.

जेव्हा मनुने(हजरत नूह,(प्रेषित)) ह्यांनी विश्वास न ठेवणाऱ्यांना शाप दिला तेव्हा प्रचंड महापुराने सर्व जगाला गिळंकृत केले व ह्या महाप्रलयांत फक्त ईश्वरावर विश्वास ठेवणारे हे मनुसह वाचले व बाकिचे सर्व नष्ट झाले.

जल प्रलयानंतर मनु व त्याचे अनुयायी हे वैदिक धर्माचे आचरण करीत होते. तर इस्लाम हा खरोखरच वैदिक धर्म आहे. कारण मुहम्मद(स) ह्यांनी इस्लाम म्हणुन नवीन धर्माची सुरूवात केली नाही. पण मनु आणि आधीचे प्रेषित ह्यांनी जे शिकविले त्याचेच पुनरूज्जीवन केले. पवित्र कुराणातील खालील श्लोक ह्या विधानाला पुष्टी देते.

*"त्याने(ईश्वराने) हे मुहम्मद(स) तुम्हाला आदेश दिला की, त्याच धर्माचे अनुकरण कर जो त्याने(ईश्वराने) मनू(नुह) ह्यांना त्याचे आज्ञापालन करण्याचे आदेश दिले होते. तसेच त्याने अब्राहम(अबिराम) मॉसेस व जीझस ख्रिस्त ह्यांनापण पाठविले होते. त्याने त्या सर्वांना धर्माची स्थापणा करा व त्यांच्यामध्ये विभाजन करू नका असा हुकुम फर्माविला होता.*
(पवित्र कुराण ४२:१३)

कुराण हे जीवनाची उच्च तत्वे, सभ्य वागणुक, वैश्विक प्रेम, एकाच ईश्वराची संकल्पना इत्यादि चांगल्या तत्वाची शिकवण देते. आपण त्या सर्व तत्वांचे पवित्र वैदिक ग्रंथामध्येसुद्धा ओझरते दर्शन घेतो.

- पवित्र कलकी अवतार आणि हज़रत मुहम्मद(स.) या दोघांतील एकसारखेपणा यावर आपण चर्चा केली. परंतु कोणीही म्हणू शकेल कि वरील चर्चा केवळ कल्पना आहे, आणि यावर काहीही भक्कम पुरावा नाही कि पवित्र कलकी अवतार हेच मुहम्मद(स.) आहेत किंवा हज़रत मुहम्मद यांचाच उल्लेख पवित्र कलकी पुराण व भागवत पुराणामध्ये केलेला आहे.

म्हणुन कलकी अवताराचा सारखेपणा कायम करण्यासाठी आणि पवित्र पुराणांतील हजरत मुहम्मदची (स.) भविष्यवाणी सिद्ध करण्यासाठी आपण हिंदु धर्मातील पवित्र पुस्तकांमधील पुढील श्लोकांचा संदर्भ घेऊ या.

*एतस्मिन्नन्तिरे म्लेच्छ आर्चार्य्येण समान्वितः।*
*महामद इति ख्यातः शिष्यशाखा समान्वितः।*
(भ. पू. पर्व-३ खंड-३, अध्याय-३, श्लोक-५)

- भविष्यपुराण असे सांगते, "दुसऱ्या देशांत प्रेषित हा त्याच्या साथीदारांसह आगमन करील. त्याचे नाव मंहमद असेल व तो वाळवंटी देशांत प्रगट होईल.

पंडित धरमवीर उपाध्याय ह्यांनी "अंतिम ईश्वर दुत" ह्या नावाचे प्रसिद्ध पुस्तक लिहिले ज्याचे प्रकाशन हे नॅशनल प्रिंटिंग प्रेस, दर्यागंज, न्यू दिल्ली ह्यांनी १९२३ मध्ये केले. ह्या पुस्तकांत श्री. उपाध्यायजी लिहितात, काग बुसंडी आणि गरूड हे श्रीरामाच्या सहवासात पुष्कळ काळ राहिले. ते श्रीरामाच्या शिकवणीचे नुसते अनुकरण करीत नव्हते, तर तीच शिकवण ही सर्व सामान्य माणसापर्यंत पोहोवचण्याचे कार्य करीत होते. तुळशीदासजींनी वरील शिकवणीचे त्यांच्या संग्रामपुराणाच्या भाषांतरामध्ये वर्णन केलेले आहे. त्यांनी असे लिहीले की, शंकरांनी त्याच्या पुत्राजवळ भावी काळातील धर्माची भविष्यवाणी पुढील शब्दात वर्णन केली होती.

| **यहां न पक्षपात कछु राखहुं<br>वेद, पुराण, संत मत भाखहुं ।** | कोणताही पक्षपात न करता मी संत. वेद आणि पुराणे ह्यांची शिकवण स्पष्ट करून सांगतो. |
|---|---|
| **संवत विक्रम दोऊ अनङ ।<br>महाकोक नस चतुर्पतङ** | तो सातव्या विक्रम संवत्सरांत चार ताऱ्याच्या (सुर्य) उदयाबरोबर जन्माला येईल. |
| **राजनीति भव प्रीति दिखावै<br>आपन मत सबका समझावै ।** | तो राज्य करणारा लायक असेल, तर्क, प्रेम व शहानपणा या बळाच्या जोरावर तो त्याची शिकवण पटवुन देईल. |
| **सुरन चतुसुदर सतचारी ।<br>तिनको वंश भयो अति भारी** | त्यांचे चार मुख्य अनुयायी असतील, त्यामुळे त्यांच्या अनुयायात वाढ होईल |
| **तब तक सुन्दर मद्दिकोया ।<br>बिना महामद पार न होया ।** | जोपर्यंत स्वर्गीय ग्रंथ हा पृथ्वीवर असेल मुहम्मद शिवाय मुक्ति मिळणार नाही. |
| **तबसे मानहु जन्तु भिखारी ।<br>समस्थ नाम एहि व्रतधारी ।** | लोक, कीटक आणि प्राणि हे त्याचे (मुहम्मदचे)नाव घेतल्यानंतर ईश्वराचे आज्ञापालक बनतील. |
| **हर सुन्दर निर्माण न होई<br>तुलसी वचन सत्य सच होई ।** | त्यानंतर, त्याच्यासारखा कोणीही जन्माला येणार नाही. तुलसीदास जे सांगतो ते खरे होईल. |

(संग्राम पुराण, खंड-१२, कांड-६, पद्द्यानुसार गोस्वामी तुलसीदास हजरत मुहम्मद (स.) आणि भारतीय धर्मग्रंथ लेखक डॉ. एम.ए.श्रीवास्तव, पान क्र.१८)

इति अल्लोपनिषदांतील भविष्यवाणी

नागेंद्र नाथ बासू ह्यांनी संपादित केलेल्या विश्वकोशाच्या दुसऱ्या भागात अंतिम संदेशहवाकाचे भविष्य खालीलप्रमाणे वर्तविली आहे.

| | |
|---|---|
| आदल्ला बूक मेककम् अल्लबूक निखादकम् ।।४। | ह्या श्लोकाचे भाषांतर करता येणे शक्य झाले नाही. |
| अला यज्ञन हुत हुत्वा अल्ला ः सूर्य्य चन्द्र सर्वनक्षत्राः ।।५। | याग युगापासुन ईश्वराची प्रार्थना केली जाते.सूर्य चंद्र आणि तारे हे ईश्वरामुळे आहेत. |
| अल्लो ऋषीणां सर्व दिव्यां इन्द्राय पूर्व माया परमन्तरिक्षा ।।६।। | ईश्वर हा ऋषींचा (संताचा) तो आहे. तो इंद्रापेक्षाहि महान आहे व ह्या अंतरिक्षपेक्षाही रहस्यमय आहे. |
| अल्लः पृथिव्या अन्तरिक्ष्ञं विश्वरुपम् । ७।। | ईश्वर हा पृथ्वी, आकाश व विश्वाच्या सर्व वस्तुमध्ये दृश्यमान आहे. |
| इल्लांकबर इल्लांकबर इल्लां इल्लल्लेति इल्लल्लाः ।।८।। | ईश्वर हा महान आहे, ईश्वर हा महान आहे कोणीही त्याच्या तोडीचा नाही. |
| ओम् अल्ला इल्लल्ला अनादि | ओम म्हणजे अल्लाह. आपण त्याची सुरूवात आणि शेवट ह्याचा अंदाज करू शकत नाही. आपण दृष्टांपासून रक्षण करण्यासाठी अशा ईश्वराची प्रार्थना करतो. |
| दे स्वरुपाय अथर्वण श्यामा हुह्री जनान पशून सिध्दान ः जलवरान् अदृष्टं कुरु कुरु फट ।।९ | हे ईश्वर। दुष्ट गुन्हेगार, धार्मिक लोक जे लोकांची दिशाभूल करतात. त्याचा नाश कर आणि पाण्यातील नुकसान करणाऱ्या किटांणुपासुन (Evil Creature of Water) आमचे रक्षण कर. |
| असुरसंहारिणी हूं ह्रीं अल्लो रसूल महमदरकबरस्य अल्लो | ईश्वर हा दुष्ट शक्तिंचा नाश करणारा आहे मुहम्मद हा महान ईश्वराचा प्रेषित आहे. |
| अल्लाम् इल्लल्लेति इल्लल्ला ।।१०।। | ईश्वर हा ईश्वर आहे. त्याच्यासारखा दुसरा कोणीही नाही. |

(इति अल्लोपनिषद हजरत मुहम्मद(स.) आणि भारतीय धर्मग्रंथ. लेखक- डॉ. एम.ए. श्रीवास्तव, पान नं.३०)

गोरखपुर येथुन गीता प्रेसने प्रकाशित केलेले कल्याण मॅगझिन ह्यामध्ये उपनिषदांक ह्या खास अंकामध्ये २२० उपनिषदांत अल्लोपनिषद ह्याचा संदर्भ १५ व्या ठिकाणी आहे. डॉ. वेदप्रकाश उपाध्याय ह्यांनी पण आपल्या प्रदिप प्रकाशनने १९८९ मध्ये प्रसिद्ध केलेल्या वैदिक साहित्य एक विवेचन ह्या पुस्तकात अल्लोपनिषदाचे वर्णन केले आहे.

• पवित्र वेद हे सुमारे ४००० वर्षापुर्वीचे जुने आहेत. जी स्वर्गीय पुस्तके वेदांच्यानंतर प्रगट (प्रसिद्ध) झाली. त्यांनी पण नराशंस किंवा हज़रत मुहम्मद (स.) ह्यांची भविष्यवाणी खालील शब्दांत केली आहे.

• यहुदी धर्मातील भविष्यवाणी :-

मी तुझ्याचसारखा (मॉसेससारखा) दुसरा प्रेषित त्याच्या भाईबंदामधुन उभा करेन व माझे शब्द त्याच्या मुखामध्ये घालीन व मी जसा हुकुम दिला आहे त्यानुसार तो त्याच्या बांधवाशी बोलेल.

( ओल्ड टेस्टामेंट डिओटिरोनॉमी १८:१८)

• खिश्चन धर्मातील भविष्यवाणी:-

येशू खिस्ताने पवित्र बायबलमध्ये असे म्हटले आहे, मी तुम्हाला पाण्याच्या बरोबर खिस्ती धर्माची दीक्षा देऊन पश्चातापाची भावना निर्माण करत आहे. पण माझ्यानंतर जो येणार आहे तो माझ्यापेक्षा अत्यंत सामर्थ्यवान असेल व त्याचे जोडे धारण करण्याचीही माझी लायकी असणार नाही. तो तुम्हाला पवित्र देवदूत व पवित्र अग्नि ह्यांनी धर्माची दीक्षा देईल.

(सेंट मॅथ्यू ३:११)

• बायबल हे मुळांत हर्ब्यु भाषेमध्ये प्रसिद्ध केले गेले आहे. हर्ब्यु भाषेतील ओल्ड टेस्टामेंट मधील पुस्तक सोलमेन ह्यामधील प्रकरण क्र.५ श्लोक १६ असे सांगतो.

*हिक्को मोमिट्टाकिम वे कुल्लो मुहम्मदीन झेडदूदेह वा झेअरई बायना जेरूसलेम*

(ओल्ड टेस्टामेंट, बुक सोलमेन, प्रकरण ५ श्लोक क्र. १६)

त्यांचे मुख अत्यंत सुंदर आहे, होय तो खरोखरच सुरेख आहे, मुहम्मद माझा आवडता आहे व माझा दोस्त आहे. हे जेरूसलेमच्या कन्यांनो! समजले का? (हर्ब्युमध्ये इम हे नावाला मान व्यक्त करण्यासाठी जोडले जाते. म्हणून मुहम्मद यांना महम्मदिम असे संबोधिले गेले आहे.)

• बोद्ध धर्मातील भविष्यवाणी :-

पवित्र कुराण असे सांगते, गौतमबुद्ध हा २३ वा अवतार आहे. त्याने त्याचा शिष्य नंदाला सांगीतले आहे.

*"हे नंदा! मी या जगातील पहिला बुद्ध नाही किंवा अखेरचा बुद्ध नाही. योग्यवेळी या जगात एक बुद्ध अवतरेल. जो सत्य आणि दानधर्म ह्यांची शिकवण देईल त्याचे अंतकरण स्वच्छ असेल. त्याची मनोवृत्ति ही शुद्ध आणि पवित्र असेल. तो विव्दान व शहाणा असेल. तो सर्व मानवांचा मार्गदर्शक आणि नेता असेल. मी ज्याप्रमाणे सत्य आचरणाची शिकवण दिली. त्याचप्रमाणे तो सत्याची शिकवण देईल. तो जगाला जीवनाचा शुद्ध आणि सर्व दृष्टींनी परिपूर्ण असा मार्ग दाखविल. हे नंदा! त्याचे नाव मैत्रेय असे असेल."* ( गॉसपेल ऑफ बुद्ध; कर्ता-करूस, पान २१७)

• डॉ. वेदप्रकाश ह्यांनी त्यांच्या पुस्तकांत असे सिद्ध करून दाखविले आहे. (दोन पुस्तकांचा आधीच उल्लेख केलेला आहे.) की सर्व पवित्र धर्मग्रंथातील भविष्यवाणी ही पवित्र नराशंस किंवा मुहम्मद यांच्यासाठी आहेत.

• हे सर्व लिहीण्यामागचा हेतू काय आहे?

जर आपण एखाद्या परकिय देशांत गेलो जेथे प्रत्येकजण हा आपणास नविन आणि परका आहे. व आपणास असे कळून आले कि, त्यांच्यामध्ये

आपल्या देशांतुन आलेला एकजण आहे. तर अशा व्यक्तिशी परिचय नसून देखील तिच्याविषयी आपणास मित्रत्व, सहानुभूती वाटते आणि आपण त्या व्याक्तिकडे आकर्षित होतो. कारण ती व्यक्ति आणि आपणामध्ये सर्वसाधारण जोडणारा एक दुवा असतो व ती म्हणजे आपली मातृभुमी.

ही काहीतरी साधर्म्य असणारी भावनाच दोन परक्या माणसांतील अंतर कमी करते. त्याचप्रमाणे आपण जर आपला धर्म व अन्य धर्म ह्यांमधील जर काही समान गोष्टी शिकलो तर आपापसातील ही परकेपणाची भावना कमी होईल.

आता आपणास ठाऊक आहे की, हिंदुचा पवित्र नराशंस आणि मुसलमानाचा हजरत मुहम्मद (स.) हे एकच आणि समान आहेत. ही समानतेची भावनाच हिंदु, मुस्लिम ह्यांच्यामधील व्देष आणि अंतर कमी करण्यास मदत करील.

आपण ह्या ज्ञानाचा प्रसार हा सर्वसामान्य मानवांमध्ये आपापसांतील तिरस्कारांची भावना कमी करण्यासाठी करू या व या मानवजातीत आणि जगात शांती आणि भरभराट आणु या!

## MR. Q. S. KHAN

### IS ALSO AUTHOR OF FOLLOWING BOOKS.

1. Introduction to Hydraulic Presses.
2. Design and Manufacturing of Hydraulic cylinders.
3. Study of Hydraulic Valves, Pumps and Accumulators.
4. Study of Hydraulic Accessories
5. Study of Hydraulic Circuit
6. Study of Hydraulic Seals, Fluid Conductor, and Hydraulic Oil.
7. Essential knowledge required for Design and Manufacturing of Hydraulic Presses.
8. Law of success for both the Worlds.
   (This book is also translated in Marathi language with title "Yashachi Gurukilli")
9. Hajj. Journey Problems and their easy Solutions.
   (This book is translated in Urdu, Hindi, Gujarati, and Bengali languages)
10. Teachings of Vedas and Quran